विकास योजना - बसमतनगर (जिल्हा हिंगोली)
महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६
चे कलम ३७ (२) अन्वये अधिसूचना

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र- टिपीएस-३००८/८२३/प्र.क्र.१३०/२००९/नवि-३०.
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक - ०९/०४/२०१०.

पहा - १) शासन निर्णय क्र.टिपीएस-३५०६/३९६/प्रक्र.३१०/२००६/नवि-३० दि.२८/०८/२००६
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.
वि.यो.बसमतनगर/१८४-२००९/ टीपीव्ही-५/६२०५, दिनांक २९/०९/२००९

**शासन निर्णय :-** सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(शिवाजी पाटणकर)
अवर सचिव

प्रति-
विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
जिल्हाधिकारी, हिंगोली.
संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उप सचिव (नगर रचना ) नगर विकास विभाग मंत्रालय मुंबई
उप संचालक नगररचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सदर फेरबदलानुसार नकाशे अधिप्रमाणित करण्याकरीता शासनास सादर करावेत)
सहायक संचालक नगर रचना, हिंगोली शाखा, हिंगोली.
मुख्याधिकारी, बसमतनगर नगर परिषद, जिल्हा हिंगोली.
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद.
त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्राच्या औरंगाबाद विभागीय पुरवणीमध्ये प्रसिद्ध करुन तिच्या ५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.
कक्ष अधिकारी, (न.वि-२९) नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची सूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यांत यावी
निवड नस्ती, नवि-३०.

NOTIFICATION-2010.lwpF:

विकास योजना -बसमतनगर जि.हिंगोली

स.नं.१५१/ब क्षेत्र १.३८ हेक्टर आरक्षणातून वगळणेबाबत....

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचनाअधिनियम, १९६६ चे कलम - ३७(२) अन्वये मंजूरीबाबत.

**अधिसूचना**

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :०९ एप्रिल, २०१०.

**महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६.**

क्र. : टिपीएस-३००८/८२३/प्र.क्र.३३०/२००९/नवि-३० :- ज्याअर्थी बसमतनगर शहराची सुधारित विकास योजना [यापुढे "उक्त विकास योजना" असे उल्लेखिलेली] शासनाने नगर विकास विभाग अधिसूचना क्र. टिपीएस-३१९९/५१३/प्र.क्र.८१/१९९९/नवि-३०, दिनांक २४ फेब्रुवारी, २००० अन्वये भागश:मंजूर केली असून ती दिनांक २४ एप्रिल, २००० पासून अंमलात आली आहे तर सारभूत स्वरुपाच्या बदलाची पुनर्प्रसिध्द विकास योजना शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र. टिपीएस-३१९९ / ५१३ / प्र.क्र.८१/१९९९/नवि-३०, दि.२० डिसेंबर २००१ अन्वये मंजूर झालेली असून ती दि.११फेब्रुवारी २००२ पासून अंमलात आली आहे;

आणि ज्याअर्थी उक्त विकास योजनेत सर्व्हे क्र. १५१/ब मधील क्षेत्रावर आरक्षण क्र. ३० "सांस्कृतिक सभागृह व नगर परीषद प्रयोजनार्थ" व आरक्षण क्र.५२ "बगीचा" ही आरक्षणे प्रस्तावित आहेत;

आणि ज्याअर्थी सर्व्हे क्र. १५१/ब मधील आरक्षण क्र.३० "सांस्कृतिक सभागृह व नगर परीषद प्रयोजनार्थ" व आरक्षण क्र.५२ "बगीचा"(भागश:) खालील एकूण क्षेत्र आरक्षणातून वगळणेबाबत श्रीमती ग्यानाबाई नवजी नवघरे यांनी मा. उच्च न्यायालयात याचिका क्र.५१४९/२००५ दाखल केली होती.सदर याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२०/१२/२००५ रोजीच्या निर्णयान्वये, प्रश्नाधिन जागेबाबत भूसंपादन कार्यवाही मागे घेण्यात सक्षम प्राधिकारी यांचेकडे, भूसंपादन अधिनियम, १८९४ चे कलम ४८ अन्वये अर्ज करावा, त्यावर सक्षम प्राधिकारी यांनी आठ आठवड्यात निर्णय घ्यावा, असे आदेश दिले तथापि सदर जमीन भुसंपादनातून वगळण्याबाबत अधिसूचना न निघाल्याने अवमान याचिका क्र.१९३/२००६ दाखल झाली. त्यावर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी दि.१५/५/२००८रोजी श्रीमती ग्यानाबाई नवजी नवघरे यांच्या मालकीचे १.३८ हे. क्षेत्र भूसंपादनातून वगळले आहे;

आणि ज्याअर्थी, बसमतनगर नगर परीषदेने तिच्या सर्वसाधारण सभेच्या ठराव क्र.१६ दि.२५/०३/२००६ अन्वये, सर्वे क्र.१५१ (भागश:) मधील क्षेत्रावरील आरक्षण क्र.३० "सांस्कृतिक सभागृह व नगर परीषद प्रयोजनार्थ" व आरक्षण क्र. ५२ "बगीचा" तसेच पूर्व-पश्चिम १५.०० मीटर रुंद विकास योजना रस्ता वगळून त्याखालील क्षेत्र रहिवास विभागात समाविष्ट करण्याचे ठरवून तिचे पत्र

NOTIFICATION-2010.lwp5

क्र.५५६२/०६, दि.१९/०८/२००६ अन्वये महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३७ अन्वये (यापुढे "उक्त अधिनियम"असे उल्लेखिलेला) चे कलम ३७ च्या उप-कलम (१) अन्वये फेरबदलाचा प्रस्ताव (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव"असे उल्लेखिलेला) आवश्यक ती कार्यवाही पूर्ण करून शासनास मंजूरीसाठी सादर केला आहे;

आणि ज्याअर्थी, शासन अधिसूचना क्र.टिपीएस-३५०६/३९६/प्र.क्र.३५०/२००६/नवि ३०, दि.२८/०८/२००७ अन्वये श्रीमती ग्यानाबाई नवघरे यांच्या उक्त जमीनी वरील आरक्षणे वगळणेबाबत निर्णय प्रलंबित ठेवला होता;

आणि ज्याअर्थी, शासनाने आवश्यक ती चौकशी केल्यानंतर तसेच संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेऊन, उक्त फेरबदल प्रस्तावास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात यावी, असे राज्य शासनाचे मत झाले आहे;

"श्रीमती ग्यानाबाई नवघरे यांच्या मालकीच्या सर्वे क्र.१५१/ब मधील क्षेत्रावरील आ.क्र.३०'सांस्कृतिक समागृह व नगर परीषद प्रयोजनार्थ' व आरक्षण क्र.५२ "बगीचा" वगळण्यात यावे."

त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम ३७ चे उप कलम [२] अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकारांचा वापर करुन उक्त विकास योजनेतील फेरबदल प्रस्तावास बदलासह शासन मंजुरी देत आहे आणि त्यासाठी उपरोल्लिखित दि.२४/०२/२००० ची विकास योजना मंजुरीची अधिसूचना सुधारीत करण्यात येत आहे;

उक्त विकास योजना मंजुरीच्या अधिसूचनेच्या शेवटच्या नोंदीनंतर पुढील नोंदीचा समावेश करण्यात येत आहे.

**नोंद**

"बसमतनगर शहराच्या सुधारीत विकास योजनेतील सर्वे क्र.१५१/ब मधील श्रीमती ग्यानाबाई नवजी नवघरे यांच्या मालकीच्या १.३८ हे. क्षेत्रावरील (याचिका क्र.५१४९/२००५ मधील Suit Land) आरक्षण क्र.३० "सांस्कृतिक समागृह व नगर परीषद प्रयोजनार्थ" व आ.क्र.५२ 'बगीचा' वगळून त्याखालील क्षेत्र नकाशात दर्शविल्यानुसार रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे;"

टिप :- १) सदरहू फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा मुख्याधिकारी, बसमतनगर नगर परिषद, जिल्हा हिंगोली यांच्या कार्यालयांत कामकाजाच्या दिवशी अवलोकनार्थ ठेवण्यात आला आहे.
२) प्रस्तुत अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर "www.urban.maharashtra.gov.in" ह्या पत्त्यावर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शिवाजी पाटणकर )
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

NOTIFICATION-2010.doc

Development Plan - Basatnagar Disti. Hingoli.
Sanction under section 37[2] of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.

## NOTIFICATION

Government of Maharashtra
Urban Development Department,
Mantralaya, Mumbai 400 032.
Dated :- 09 April, 2010.

**The Maharashtra Regional & Town Planning Act 1966**

No. TPS-3008/823/CR-330/2009/UD-30 :- Whereas the Revised Development Plan of Basmatnagar (hereinafter referred to as "the said Development Plan") has been sanctioned by Government vide Urban Development Department's Notification No.TPS-3199/513/CR-81/1999/UD-30, dated 24th February of 2000 which came into force from 24th April of 2000. And the Republished Development Plan of substantial nature has been sanctioned by Government vide Urban Development Department's Notification No.TPS-3199/513/CR-81/99/UD-30 dated 20th December 2001 which came into force from 11th February 2002:

And whereas in the said Development Plan the land bearing Survey No 151/B is reserved as Site No.30 "Cultural Centre and Municipal Purpose"and Site No.52 "Garden";

And whereas, Smt.Gyanabai Navaghare has filed Writ Petition No.5149/2005 before Honourable High Court to delete the land admeasuring 1.38 Ha. bearing Survey No.151/B affected by Site No.30 "Cultural Centre and Municipal Purpose" (Partly) and Site No 52 "Garden" (Partly). In this matter Honourable High court has directed the applicant to submit an application under Section 48 of the Land Acquisition Act, 1894 for dropping the land acquisition proceedings & the application shall be decided by the competent authority within the period of eight weeks. However the abovesaid land was not deleted from land acquisition, the applicant Smt.Gyanabai Navaghare filed contempt Petition no. 193/2006 in the High Court. And accordingly the Divisional Commissioner, Aurangabad has dropped the proceeding of the land acquisition regarding the land admeasuring 1.38 Ha. belonging to Smt. Navghare on 15/11/2008;

And whereas, the Basmatnagar Municipal Council [hereinafter referred to as "the said Municipal Council"]vide its General Body Resolution No.16, dated 25/03/2006 has decided to delete Site No.30 "Cultural Centre and Municipal Purpose" (Partly) and Site No 52 "Garden" and East-West 15.00 mt. wide Development Plan Road proposed through Survey No.151 (part) and to include the land so released in Residential Zone and accordingly the said Municipal Council has submitted the modification proposal [hereinafter referred to as "the said Modification Proposal"] to Government for sanction vide its Marathi letter No. 5562/06 , dated 19/08/2006 after following all the legal procedure stipulated under section 37[1] of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 [Maharashtra XXXVII of 1966][hereinafter referred to as "the said Act"] ;

And whereas, Government vide Notification No. TPS-3106/396/CR-310/2006/UD-30, deated 28/08/2007 kept abeyance the decision regarding the land owned by Smt. Gyanabai Navaghare;

And whereas after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune the Government of Maharashtra is of the opinion that said Modification Proposal should be sanctioned as follows-;

The land bearing Survey No.151/B belonging to Smt.Gyanabai Nevaghare should be deleted from Site no.30 Cultural Centre & Municipal Purpose & Site No.52 Garden & to be included in the residential zone.

Now therefore, in exercise of powers conferred under sub-section [2] of section 37 of the said Act, Government hereby sanctions the said Modification Proposal some conditions and for that purpose amends the above referred Notification dated 24th February of 2000 as follows;

In the Schedule of Modification appended to the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added;

**ENTRY**

"In the Revised Development Plan of Basmatnagar the land bearing Survey No.151/B admeasuring 1.38 Ha. belonging to Smt.Gnyanabai Navaghare(Suit Land in Writ Petition No.5149/2005) is deleted from Site No.30 "cultural Centre and Municipal Purpose" &Site No.52 "Garden" and land so released is included in Residential zone as shown on the plan.

Note:- 1) The aforesaid part plan showing the above Modification is kept open for inspection for the public in the Office of the Chief Officer, Basmatnagar Municipal Council, Dist.Hingoli during office hours.

2) The aforesaid Notification is available on Government Web Site @ www.urban.maharashtra.gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra.

[Shivaji Patankar]
Under Secretary to Government.

NOTIFICATION-2010.lwp/F